विभागीय संदर्भ सेवा रुग्णालय, नाशिक येथील ॲडल्ट ॲण्ड पेडियाट्रीक व्हेन्टीलेटर्स या उपकरणाच्या सर्वकष वार्षिक देखभाल करारास मान्यता देण्याबाबत.

# महाराष्ट्र शासन

## सार्वजनिक आरोग्य विभाग

## शासन निर्णय क्रमांकः संकिर्ण २०१५/प्र.क्र. १८८ /आरोग्य-३

१० वा मजला, संकुल इमारत,
जी.टी.रुग्णालय आवार, मुंबई-४०० ००१.
तारीख: ११ जानेवारी, २०१७.

वाचा -

१. शासन निर्णय क्रमांकः वित्त विभाग क्रमांक: विअप्र २०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम, भाग-२, दि.१७.४.२०१५.
२. शासन निर्णय क्रमांकः सार्वजनिक आरोग्य विभाग क्रमांक: खरेदी २००७ /प्र.क्र.६१ / आरोग्य-८, दि.४.१२.२००७.
३. शासन निर्णय क्रमांकः सार्वजनिक आरोग्य विभाग क्रमांक: संकिर्ण २०१२/प्र.क्र.३०२ / आरोग्य-३, दि.१.२.२०१३.
४. आरोग्य सेवा संचालनालयाचे पत्र क्र. संआसे /कक्ष-३/टे.३/ई.फा./विसंसेरु,नाशिक/ व्हेन्टीलेटर्स / ४०२८-३०/१६, दि.०२.०३.२०१६.

## शासन निर्णय-

उपरोक्त संदर्भाधीन शासन निर्णयान्वये प्रदान करण्यात आलेल्या वित्तीय शक्तीचा वापर करुन व शासनाने वेळोवेळी निर्गमीत केलेल्या कार्यकारी आदेशाच्या अनुपालनाच्या अधीन राहून आणि त्यामध्ये अंतर्भूत असलेल्या नियम आणि विनियम यामध्ये विहित केलेल्या अटी व शर्तींच्या अधीन राहून विभागीय संदर्भ सेवा रुग्णालय, नाशिक येथील ॲडल्ट ॲण्ड पेडियॉट्रीक व्हेन्टीलेटर्स (३ नग) च्या सन २०१६-१७ साठीच्या सर्वकष वार्षिक देखभाल करार करण्यासाठी येणा-या रु.१,८८,८५०/- (रु.एक लक्ष अठ्ठयाऐंशी हजार आठशे पन्नास फक्त) इतक्या खर्चास या शासन निर्णयाव्दारे मान्यता देण्यात येत आहे. सदर खर्च कोणत्या माध्यमातून करावा याबाबत संचालक, आरोग्य सेवा, मुंबई यांनी निर्णय घेऊन त्यानुसार कार्यवाही करावी.

२. हा शासन निर्णय, वित्तीय अधिकार नियम पुस्तिका, १९७८, भाग-२ मध्ये संदर्भाधीन शासन निर्णय क्रमांक-२ अन्वये नव्याने समावेश केलेल्या वित्तीय शक्ती आणि त्यामध्ये संदर्भाधीन शासन निर्णय क्रमांक-३ अन्वये केलेल्या बदलास अनुसरुन निर्गमीत करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०१११४२५०४१८१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Roshani Dinesh Kadam Patil

Digitally signed by Roshani Dinesh Kadam Patil
DN: CN = Roshani Dinesh Kadam Patil, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Public Health Department
Date: 2017.01.11 16:40:18 +05'30'

**(रो.दि.कदम पाटील)**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,
महालेखापाल, महाराष्ट्र १/२, (लेखा व अनुज्ञेयता), मुंबई/नागपूर.
आयुक्त, आरोग्य सेवा तथा अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान,मुंबई.
संचालक, आरोग्य सेवा, मुंबई.
सहसंचालक, आरोग्य सेवा(रुग्णालये-राज्यस्तर), मुंबई.
उपसंचालक, आरोग्य सेवा, नाशिक मंडळ, नाशिक.
वैद्यकीय अधिक्षक, विभागीय संदर्भ सेवा रुग्णालय, नाशिक
महालेखापाल, महाराष्ट्र १/२, (लेखा व अनुज्ञेयता), मुंबई/नागपूर.
जिल्हा कोषागार अधिकारी, नाशिक.
वित्त विभाग,(कार्यासन- विनियम ), मंत्रालय, मुंबई.
निवडनस्ती (आरोग्य-३)